भटक्या व विमुक्त समाजातील नागरिकांना शिधापत्रिका वितरित करण्याबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र: शिवाप-१०२४/प्र.क्र.१२/नापु-२८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,मंत्रालय मुंबई-४०० ०३२
दिनांक : २८ जून, २०२४

**वाचा :-** १) शासन निर्णय, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, क्र. साविव्य-१०९९/ प्र.क्र.८८८६/नापु-२८, दिनांक ०५.११.१९९९
२) शासन निर्णय, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, क्र. साविव्य-१००१/ प्र.क्र.४८३/नापु-२८, दिनांक ०८.०८.२००१
३) शासन निर्णय, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, क्र. साविव्य-१००५/ प्र.क्र.१८०३/नापु-२८, दिनांक २५.०५.२००५
४) शासन निर्णय, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, क्र. शिवाप-२०१३/ प्र.क्र.१०५/नापु-२८, दिनांक २९.०६.२०१३
५) शासन निर्णय, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, क्र. याचिका-२०१२/३३-३१/ प्र.क्र.८१ (अहवाल)/नापु-२८, दिनांक ०४.०२.२०१४

**प्रस्तावना :-**

नवीन शिधापत्रिकांसाठी निकष व कार्यपध्दती प्रथमत: संदर्भाधिन क्र. १ येथील दिनांक ०५.११.१९९९ च्या शासन निर्णयान्वये विहित करण्यात आली आहे. त्यामध्ये संदर्भाधिन क्र. २ येथील दिनांक ०८.०८.२००१ व संदर्भाधिन क्र. ३ येथील दिनांक २५.०५.२००५ च्या शासन निर्णयान्वये अंशत: सुधारणा करण्यात आली आहे. नवीन शिधापत्रिका वितरित करतांना घ्यावयाची काळजी व दक्षता याबाबत संदर्भाधिन क्र. ४ येथील दिनांक २९.०६.२०१३ च्या शासन निर्णयान्वये सूचना देण्यात आल्या आहेत. नवीन शिधापत्रिका देण्यापूर्वी अर्जदाराचे उत्पन्न तपासण्याची कार्यपध्दती संदर्भाधिन क्र. ५ येथील दिनांक ०४.०२.२०१४ च्या शासन निर्णयान्वये विहित करण्यात आली आहे.

राज्यातील भटके विमुक्त समाजाच्या नागरीकांना सर्वसामान्य जनतेप्रमाणे शिधापत्रिका वितरित करताना कागदोपत्री अडचणींचा सामना करावा लागतो. राज्यातील भटके विमुक्त समाजाचा व्यक्ती हा समाजाचा घटक असून त्यांनाही सन्मानाने जगण्याचा व शासकीय योजनांचा लाभ घेण्याचा मुलभूत अधिकार आहे. ही बाब विचारात घेता राज्यातील भटक्या विमुक्त समाजाच्या नागरीकांना नवीन शिधापत्रिका मिळविण्यासाठी येणाऱ्या अडचणींचा सहानभूतीपुर्वक विचार करून त्यांना राष्ट्रीय अन्न सुरक्षा योजनेचा लाभ देण्यासाठी सुलभ कार्यपध्दती अनुसरून त्यांना पात्रतेनुसार योग्य ती शिधापत्रिका देऊन त्यावरील अनुज्ञेय लाभ देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

नवीन शिधापत्रिकेसाठी संदर्भ क्र. ४ वरील दिनांक २९.०६.२०१३ अन्वये निश्चित केलेल्या प्रचलित पध्दतीनुसार आवश्यक असलेले पुरावे सादर करण्यामध्ये राज्यातील भटके विमुक्त समाजाच्या नागरीकांना येणाऱ्या अडचणींचा सहानभुतीपुर्वक विचार करून त्यांना ओळखीचा पुरावा (Identification Proof) व वास्तव्याचा पुरावा (Residential Proof) सादर करण्याबाबत सूट देण्यात येत आहे. सदर कागदपत्रांची संबधितांकडून मागणी करण्यात येऊ नये.

२.  मात्र भटक्या विमुक्त समाजाच्या नागरीकांना नवीन शिधापत्रिका मिळणेसाठी खालील नमूद बाबीपैंकी  कोणत्याही एका बाबीची पुर्तता संबधितांनी करणे आवश्यक आहे.

(क) मतदार यादीमध्ये मतदार म्हणून नोंदणी झाल्याने प्राप्त झालेले मतदार ओळखपत्र.

(ख) सामाजिक न्याय विभागाच्या जिल्हा समाजकल्याण अधिकारी किंवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या राजपत्रित  अधिकाऱ्याचे भटक्या विमुक्त समाजाच्या नागरीक असल्याबाबतचे प्रमाणपत्र.

(ग) रहिवासासंदर्भात शहरी भागात नगरसेवक व ग्रामिण भागात सरपंच/उपसरपंच यांचे त्या भागातील रहिवाशी प्रमाणपत्र ग्राह्य धरावे.

वरीलपैकी कोणतेही कागदपत्र व आधारकार्ड उपलब्ध नसल्यास अर्जदाराकडून स्वयंघोषणापत्र (Self-declaration form) भरुन घेण्यात यावे. **(प्रपत्र-अ)**

३.  भटक्या विमुक्त समाजाच्या नागरिकांकडून नवीन शिधापत्रिकासाठी अर्ज भरून घेऊन त्यांना शिधापत्रिका वितरित करण्यासाठी सर्व संबंधित जिल्हाधिकारी यांनी विशेष मोहिमेचे आयोजन करावे. सदर मोहिमेंतर्गत भटक्या विमुक्त समाजाच्या नागरीकांना अनुज्ञेय शिधापत्रिका वितरित करून त्यावरील लाभ देण्यात यावेत.

४.  सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०७०३१२२२४४६८०६ असा आहे.  हा आदेश डीजीटल स्वाक्षरीने साक्षंकित  करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MAHESH HANAMANT KANADE

Digitally signed by MAHESH HANAMANT KANADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLIES AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, 2.5.4.20=41ed99a2b07b46643afea9e85e533e248760d3169daa90df7cae1015f0ed87bd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5CD41E69B030FAA3E78F2D9BC292DDDC6005D679E71E7886A8A18B00E94B65C5, cn=MAHESH HANAMANT KANADE
Date: 2024.07.03 12:38:55 +05'30'

**( महेश कानडे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२) मा. उपमुख्यमंत्री(गृह) यांचे प्रधान सचिव
३) मा. उपमुख्यमंत्री(वित्त व नियोजन) यांचे प्रधान सचिव
४) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
३) अपर मुख्य सचिव व मुख्य निवडणूक अधिकारी, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
४) प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
५) मा. मंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांचे खाजगी सचिव
६) सर्व मंत्रालयीन विभाग
७) सर्व विभागीय आयुक्त
८) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय,मुंबई
९) नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई
१०) सर्व जिल्हाधिकारी
११) सर्व महानगरपालिका आयुक्त,
१२) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी

१३) सर्व उपायुक्त (पुरवठा)

१४) सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी

१५) अन्नधान्य वितरण अधिकारी, पुणे/सोलापूर/नागपूर

१६) सर्व सहायक आयुक्त, समाजकल्याण / जिल्हा समाजकल्याण अधिकारी, जिल्हा परिषद

१७) प्रधान सचिव (अ.ना.पु. व ग्रा.सं.) यांचे स्वीय सहायक

१८) सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/सर्व कार्यासने, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई

१९) निवड नस्ती (नापु-२८)

**प्रपत्र - अ**

**स्वयंघोषणापत्र**

मी ------------------------------------ वय --------- पत्ता -------------- -------------------------------------------------- येथे वास्तव्य करतो. मी भटक्या व विमुक्त समाजाचा नागरीक आहे. माझ्याकडे व माझ्या कुटुंबातील सदस्यांकडे आधारकार्ड नाही. मी व माझे कुटुंबीय जिल्हाधिकारी कार्यालयामार्फत अथवा शासन मान्यता प्राप्त अधिकृत आधार नोंदणी केंद्रामार्फत पुढील ३ महिन्यांत आधारकार्ड प्राप्त करून घेईल व त्याची माहिती उपनियंत्रक/जिल्हा पुरवठा अधिकारी/अन्नधान्य वितरण अधिकारी यांना अन्नधान्य वितरण करण्यासाठी उपलब्ध करुन देईल. शासनाच्या नियमाप्रमाणे मला अनुज्ञेय असलेले अन्नधान्य वितरित करण्यात यावे.

वरील सर्व माहिती माझ्या व्यक्तीगत माहिती व समजूतीनुसार खरी आहे. सदर माहिती खोटी आढळून आल्यास मी कायद्यानुसार शिक्षेस / कारवाईस पात्र राहीन.

**ठिकाण :** **अर्जदाराची सही**

**दिनांक :** **अर्जदाराचे नाव**